**इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत राज्यात व बोर्डात प्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या समाजातील गुणवंत विद्यार्थी व विद्यार्थ्यांना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१३/प्र.क्र.६५ /विजाभज-१,**
मंत्रालय विस्तार इमारत,मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी,२०१५

**प्रस्तावना :-**

इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत राज्यात व बोर्डात प्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमाती समाजातील गुणवंत विदयार्थी व विदयार्थ्यांना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार देवून त्यांचा गौरव करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

याबाबत विचार करून माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाच्या इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेमध्ये राज्यात व बोर्डात प्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गाच्या मुलामुलींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार सन २०१५-२०१६ या शैक्षणिक वर्षापासून देण्यास शासन पुढील प्रमाणे मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये राज्यात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी | प्रत्येकी रु.१ लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| २) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये विभागीय बोर्डात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी | प्रत्येकी रु.५१ हजार रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये राज्यात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी | प्रत्येकी रु.१ लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये विभागीय बोर्डात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी | प्रत्येकी रु.५१ हजार रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |

२. या योजनेस दूरदर्शन व आकाशवाणी या माध्यमातून व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. वरील प्रमाणे विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गाच्या राज्यात प्रथम आलेल्या व बोर्डात प्रथम आलेल्या विदयार्थी व विदयार्थीनीसाठी राज्यस्तरावर परितोषिक वितरण समारंभ दिनांक १ जुलै रोजी आयोजित करण्यात यावा.

३. तसेच सदरहू विदयार्थ्यांना पुरस्कार देण्यासाठी आयोजित करावयाच्या समारंभासाठी रू. ५ लाख इतक्या खर्चास मंजुरी देण्यात येत असून सदर खर्च करण्यास संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सदर योजनेच्या तरतूदीतून प्रसिध्दी,समारंभ व इतर खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे. त्याअनुषंगाने तसेच या योजनेच्या प्रसिध्दी व समारंभाबाबत खर्च करण्याचे अधिकार संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना देण्यात येत आहे.

४. या बाबींवर होणारा खर्च हा" मागणी क्र.२२२५ अनुसूचित जाती, जमाती इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,०३ -मागासवर्गीयांचे कल्याण, ८०० - इतर खर्च (०६) बक्षिसे /पारितोषिके (०६)(०१)विजाभज प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरिता स्व.वसंतराव नाईक गुणवंत विद्यार्थी पुरस्कार, ०५ पारितोषके २२२५- D ७१६" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या पहिल्या अधिवेशनात पुरक मागणीव्दारे उपलब्ध करून देण्यात येईल.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७४ अर्थ-७ दिनांक ५.१२.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०२२५१२०४२६८२२२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2015.02.25 15:47:39 +05'30'

( डॉ.व.गो माने )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्रयांचे सचिव.
३) मा.उपमुख्यमंत्रयाचे सचिव.
४) सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय मुंबई
५) वित्त विभाग,( अर्थ-७ ) मंत्रालय मुंबई
६) नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई
७) संचालक,शिक्षण महाराष्ट्र राज्य,पुणे
८) चेअरमन,माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळ मुंबई / पुणे/ कोल्हापुर /नाशिक/ औरंगाबाद
९) लातूर/ अमरावती/नागपूर
१०) उपसंचालक शिक्षण - सर्व विभाग
११) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
१२) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण.
१३) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद
१४) महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ ( लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई /नागपूर
१५) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१६) कोषागार अधिकारी, मुंबई
१७) निवड नस्ती-विजाभज १

शासन निर्णय क्रमाक शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण २०१३/प्र.क्र.६५ /विजाभज-१,
दि. २५ फेब्रुवारी,२०१५ चे

**परिशिष्ट अ**

इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत उल्लेखनिय यश मिळविणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गाच्या मुलामुलींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे.
अंदाजित खर्चाचा तपशिल

रु.लाखात

| | | |
|---|---|---|
| १ | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये राज्यात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी प्रत्येकी रु.१ लाख X २ = रु.२ लाख | २.०० |
| २ | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये विभागीय बोर्डात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी प्रत्येकी रु.५१ हजार X १६ = रु.८.१६ लाख | ८.१६ |
| ३ | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये राज्यात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी प्रत्येकी रु.१ लाख X २ = रु.२ लाख | २.०० |
| ४ | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये विभागीय बोर्डात प्रथम आलेला विदयार्थी व विदयार्थीनी प्रत्येकी रु.५१ हजार X ८ = रु. ८.१६ लाख | ८.१६ |
| ५ | उपरोक्त गौरव प्राप्त विद्यार्थ्यांना स्मृतीचिन्ह देणे | ०.३६ |
| ६ | समारंभ आयोजनासाठी | ५.०० |
| ७ | दूरदर्शन/ आकाशवाणीवर समारंभाची प्रसिध्दी देणे | |
| | एकूण | २५.६८ |

उपरोक्त अनु.क्र.५,६,७ या बाबींवर योजनेच्या उपलब्ध होणाऱ्या तरतूदी मधून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.तसेच सदर तरतुदीतून कमी /जास्त खर्च करण्याचे अधिकार संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहतील.

**********